**ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर येथे व्याख्यान देणाऱ्या तज्ञ अभ्यागत/ प्राध्यापक/ अधिव्याख्याते यांचे मानधन वाढविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र.- एमएलआय ०८१९/ प्र.क्र. ३४/ कामगार-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक - ०९ जून, २०२३

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. - एमएलआय ०८१९/ प्र.क्र. ३४/ कामगार -६, दिनांक ३/९/२०२१.

२) शासन निर्णय, एमएलआय २०२२/ प्र.क्र. १५८/ कामगार-६, दिनांक १/२/२०२३.

३) संचालक, ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई यांचे पत्र क्र.- मश्रविसं/ ३८०, दिनांक १३/४/२०२३.

४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्र.- अर्थसं २०२२/ प्र. क्र. १०५ (१)/ मशि-३, दिनांक २७/३/२०२३.

**<u>प्रस्तावना</u> :-**

संदर्भाधीन क्र. १ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर येथील पदव्युत्तर अभ्यासक्रम शिकविण्यासाठी येणाऱ्या तज्ञ अभ्यागत/ प्राध्यापक/ अधिव्याख्याते यांना प्रति तासाच्या व्याख्यानाला रुपये ७५०/- (रुपये सातशे पन्नास फक्त) इतके मानधन देण्याचे आदेश निर्गमित करण्यात आले होते. शासनाच्या दिनांक १/२/२०२३ च्या शासन निर्णयान्वये "कै. ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व प्रादेशिक कामगार संस्था, नागपूर" या संस्थांच्या नांवात बदल करुन त्यांची नावे अनुक्रमे "ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर" अशी करण्यात आली आहेत.

२. संदर्भाधीन क्र. ४ येथे नमूद केलेल्या उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या शासन निर्णयान्वये अभ्यागत/ व्याख्यात्यांना देण्यात येणाऱ्या मानधनाच्या दरात सुधारणा करण्यात आलेली आहे. या अनुषंगाने ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर येथे येणाऱ्या तज्ञ अभ्यागत/ प्राध्यापक/ अधिव्याख्याते यांचे प्रति तास शिकविण्याचे मानधन वाढविण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार, आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर येथील पदव्युत्तर अभ्यासक्रम शिकविण्याकरिता येणाऱ्या तज्ञ अभ्यागत/ प्राध्यापक/अधिव्याख्याते यांना देण्यात येणारे मानधनाचे दर (प्रति तासाकरिता) रुपये ७५०/- (रुपये सातशे पन्नास फक्त) मध्ये वाढ करुन, सुधारित मानधनाचा दर (प्रति तासाकरीता) रुपये १,०००/- (रुपये एक हजार फक्त) इतका करण्यात येत आहे. सदर सुधारित दर हा प्रस्तुतचा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

२. ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई या संस्थेचा या कामी होणारा खर्च "मागणी क्र. के-४, मुख्य लेखाशिर्ष- २२३० कामगार व सेवायोजन, २७७, शिक्षण (००) (०१) महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई (अनिवार्य) (२२३० ०६३९), २८ व्यावसायिक सेवा" आणि ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर या संस्थेचा या कामी होणारा खर्च "मागणी क्र. के-४, मुख्य लेखाशिर्ष २२३०- कामगार व सेवायोजन, २७७, शिक्षण (००) (०४) प्रादेशिक कामगार संस्था, नागपूर येथे श्रमविज्ञान अध्ययनातील पदव्युत्तर पदवी पाठ्यक्रम (२२३० ०६६६) (अनिवार्य), २८-व्यावसायिक सेवा" या शिर्षाखाली खर्ची दाखवून त्या-त्या वर्षासाठी केलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२५/ सेवा-६, दिनांक १८/५/२०२३ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२०/ २०२३/ व्यय-१६, दिनांक ६/६/२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०६०९१६२१३८३९१० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHASHANK MADHAV SATHE

Digitally signed by SHASHANK MADHAV SATHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6b4e6443f4621997398029547f71977c2d89e32e391d622c519f3989307 8c30b, pseudonym=4050B2BBA585485C9F7047F2204D51F56E2363FA, serialNumber=11A06BF85893554AC5CDED657C0F1435AF29A0AD118FB759493 176E40002B178, cn=SHASHANK MADHAV SATHE
Date: 2023.06.09 17:19:03 +05'30'

**(श. मा. साठे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई.
२) उप संचालक, ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर.
३) प्रबंधक, ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई.
४) महालेखापाल- १ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
५) महालेखापाल-२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
९) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६ व सेवा -६) मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती.